**महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान सन २०११-१२ मध्ये सुरु ठेवणे.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र.जलसं-२०११/प्र.क्र.१६/जल-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०११.

**वाचा :**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
(१) क्रमांक : जलसं-२००२/प्र.क्र.५८१/जल-७, दिनांक २८ फेब्रुवारी, २००२.
(२) क्रमांक : जलसं-२००२/प्र.क्र.६७०/जल-७, दिनांक २९ नोव्हेंबर, २००२.
(३) क्रमांक : जलसं-१००३/प्र.क्र.७९/जल-८, दिनांक १८ जून, २००३.
(४) क्रमांक : जलसं-१००४/प्र.क्र.४७/जल-८, दिनांक २४ ऑगस्ट, २००४,
(५) क्रमांक : जलसं-१००४/प्र.क्र.४७/जल-८, दिनांक १४ सप्टेंबर, २००५.
(६) क्रमांक : जलसं-१००५/प्र.क्र.९५/जल-८, दिनांक २४ फेब्रुवारी, २००६.
(७) क्रमांक : जलसं-२००६/प्र.क्र.१३४/जल-८, दिनांक ५ एप्रिल, २००७.
(८) क्रमांक : जलसं-२००८/प्र.क्र.३१/जल-८, दिनांक १८ सप्टेंबर, २००८..
(९) क्रमांक : जलसं-२००८/प्र.क्र.३१/जल-८, दिनांक २० फेब्रुवारी, २००९..
(१०) क्रमांक : जलसं-२००९/प्र.क्र.३४/जल-८, दिनांक १ जुलै, २००९.
(११) क्रमांक : जलसं-२०१०/प्र.क्र.१३/जल-८, दिनांक १८ मार्च, २०१०.

**प्रस्तावना :**

राज्यातील पर्जन्याधारीत कोरडवाहू शेतीसाठी पाणलोट व जलसंवर्धन माध्यमातून जलसिंचन उपलब्धता वाढविणे, अत्यंत मौल्यवान असे पाणी व माती यांचे संवर्धन करणे, पडीक जमिनीचा विकास करणे, रोजगार उपलब्धतेत वाढ करणे आणि पर्यायाने कृषि उत्पादनात वाढ करुन मौल्यवान भूसंपत्तीमध्ये स्थायी स्वरुपाची सुधारणा करणे याकरीता महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान राज्यात दिनांक १ मे, २००२ पासून सुरु करण्यात आले. हे अभियान प्रामुख्याने स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था तसेच ग्रामिण भागातील जनतेच्या लोकसहभागाद्वारे राबविण्यात आले. लोकसहभागातून राबविलेल्या या अभियानाचे यश पाहता हे अभियान सन २००२-२००३ पासून सातत्याने राबविण्यात आले आहे. सन २०१०-११ मध्ये हे अभियान राबविण्यास संदर्भाधीन दिनांक १८ मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. हे अभियान सन २०११-१२ मध्ये पुढे सुरु ठेवण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील पाण्याची उपलब्धता व बारंवार येणारी दुष्काळ सदृश्य परिस्थिती लक्षात घेता जलसंवर्धनाच्या कार्यक्रमाचे अनन्य साधारण महत्व आहे. यासाठी पाणलोट विकासाचा कार्यक्रम राज्यात विविध योजनेच्या माध्यमातून राबविण्यात येतो. या कार्यक्रमाअंतर्गत करण्यात येत असलेल्या पाणलोट उपचाराची योग्य देखभाल व दुरुस्ती झाल्यास पाण्याची उपलब्धता मोठया प्रमाणात होऊ शकेल. महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान हे प्रामुख्याने

राज्यातील ग्रामीण भागातील जल, भूमी व इतर नैसर्गिक साधन संपत्तीमध्ये स्थायी स्वरुपात सुधारणा करण्याच्या दृष्टीने दिनांक १ मे, २००२ पासून राबविण्यात आले आहे. हे अभियान मुख्यत: स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था तसेच ग्रामीण भागातील जनतेच्या लोकसहभागाद्वारे आता पर्यंत राबविण्यात आले आहे. या अभियानाचे महत्व व अभूतपूर्व यश लक्षात घेऊन महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियान दिनांक १ एप्रिल, २०११ पासून दिनांक ३१ मार्च, २०१२ पर्यंत सुरु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अभियानाचे नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण यासाठी संदर्भाधीन दिनांक २८ फेब्रुवारी, २००२ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या खालील समित्या या पुढेही कार्यरत राहतील.

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | राज्यस्तरीय सुकाणू समिती | | |
| | मा.मंत्री (जलसंधारण) | - | अध्यक्ष |
| (२) | विभागीय स्तर समिती | | |
| | संबंधित विभागीय आयुक्त | - | अध्यक्ष |
| (३) | जिल्हास्तरीय समिती | | |
| | जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | सह अध्यक्ष |

**३. अभियानातील सर्व साधारण कामे :**

(१) पिण्याच्या पाण्याचे स्त्रोत संवर्धनासाठी पारंपारिक नालाबंडीग-गॅबियन बंधारे, विहिर पुनर्भरण, वनराई बंधारे इत्यादी तसेच भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेने विकसित केलेले अपारंपारिक तंत्रज्ञान (बीबीटी, फॅक्चर सील सिमेंटेशन, बोअर ब्लास्टींग) यासारखी कामे

(२) गेल्या २०-३० वर्षामध्ये विविध योजनांतर्गत घेतलेले (पाझर तलाव, वनराई बंधारे, लघुपाटबंधारे तलाव, कच्चे बंधारे, नाला बंडींग व सांडवा फुटतूट दुरुस्ती) गांवतलाव व पारंपारिक तलाव यांच्यामध्ये असलेला गाळ काढणे व आवश्यक अशी विशेष दुरुस्ती करणे. जवाहर विहिरीतील गाळ काढणे, विहिरींचे खोलीकरण

(३) पाझर तलावाची विशेष दुरुस्ती व बळकटी करणे, नालाबंडीगची विशेष दुरुस्ती

(४) **मूलस्थानी जलसंधारण :** सध्या जाणवणारे पाण्याचे दुर्भिक्ष विचारात घेता जमिनीतील ओलाव्याचा पुरेपुर वापर करण्यासाठी कमी खर्चाच्या मशागतींचा विविध पध्दतींचा अवलंब कसा करावा याबद्दलचे प्रात्यक्षिक दाखविणे.

(५) पारंपारिक जलस्त्रोत बळकटीकरण :- अभियानाचा भर हा जुन्या जलस्त्रोताच्या बळकटीकरणावर आहे.

(६) कोल्हापूर तथा लघुपाटबंधा-यांची विशेष दुरुस्ती.

(७) राज्यातील पाणलोट विकासाची अपुरी कामे प्राधान्याने पूर्ण करुन राज्यातील प्रत्येक तालुक्यातील पाणलोट विकासाची उत्तम प्रात्यक्षिके तयार करणे.

... ३

४. **अभियानातील पावसाळ्यापूर्वी करावयाची प्रमुख कामे ( Focused Activities):**

(अ) गाळ काढणे

(आ) प्रसिध्दी

(इ) मुलस्थानी जलसंधारण

(ई) विहीर पुनर्भरण.

५. **अभियानातील पावसाळ्यानंतर करावयाची कामे** :

(अ) कच्चे बंधारे

(ब) वनराई बंधारे बांधणे

६. **कार्यपध्दती :**

या अभियानात विविध यामध्ये स्थानिक पातळीवर उपलब्ध असलेल्या साधन सामग्रीचा विचार करून पाझर तलाव/ बंधा-यातील गाळ काढणे, भराई करणे ही अकुशल बाब मजुरांमार्फत करावी तसेच वाहतुकीसाठी आवश्यक असलेली मशिनरी वापरणे अपेक्षित आहे. या कार्यक्रमात जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणाखाली विविध शासकीय/ अशासकीय यंत्रणाचा समावेश राहिल. ही कार्यवाही करतांना स्थानिक पातळीवर उपलब्ध असलेले ट्रॅक्टर, ट्रॉली व जेसीबी इत्यादी साधनांचा संचय (Pool) करण्यात यावा. उपलब्ध होणारा गाळ सुपिक असल्याने जमिनीचा पोत सुधारण्यासाठी तसेच उत्पादन वाढविण्यासाठी उपयुक्त आहे. सदर गाळ मागणी केलेल्या शेतक-याला देता येईल.

७. **निधीचा स्त्रोत :**

हे अभियान लोक चळवळीद्वारे व लोकसहभागातून राबविण्यात येणार असले तरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना ( MGNREGA)(शा.नि. नियोजन विभाग क्र. मग्रारोहयो-२०११/प्र.क्र.१८/रोहयो-१, दिनांक २२ मार्च, २०११), मागास भागासाठी अनुदान निधी योजना (BRGF) इत्यादी योजनांच्या माध्यमातून उपलब्ध होणाऱ्या निधीचा देखील याकरीता उपयोग करण्यात यावा. या अभियानात राबवावयाच्या मुख्य उपक्रमासाठी पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करून घेण्यात यावा.

| उपक्रम | निधीचा स्त्रोत |
|---|---|
| गाळ काढणे (शा.नि. नियोजन विभाग क्र.मग्रारोहयो-२०११/ प्र.क्र१८/ रोहयो - १, दिनांक २२ मार्च, २०११. ) | MGNREGA निधी + लोकसहभाग |
| विहिर पुनर्भरण | MGNREGA निधी + लोकसहभाग |
| मुलस्थानी जलसंधारण | जनजागृती कार्यक्रम (कृषी विभाग) |

८. **अभियानाचा कालावधी :**

मृद व जलसंधारण कार्यक्रमाचे महत्व लक्षात घेऊन विभाग, जिल्हा व तालुका स्तरावर दिनांक ११ एप्रिल, २०११ ( महात्मा ज्योतिबा फुले यांची जयंती ) ते दिनांक १ जुलै, २०११ ( कै. वसंतराव नाईक यांची जयंती ) या कालावधीत विशेष कार्यक्रमांचे आयोजन करुन **महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियानाची** सुरुवात करण्यात यावी.

९. **प्रसिध्दी :**

सदर अभियानांतर्गत घेण्यात येणारी वरील परिच्छेदातील बहुतांशी कामे येत्या पावसाळ्यापूर्वी हाती घेतल्यास पावसाळ्यानंतर पाण्याच्या साठ्यात मोठ्या प्रमाणात वाढ करणे शक्य होईल. हे लक्षात घेता विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावर वरीलप्रमाणे विशेष कार्यक्रमाचे आयोजन करुन व्यापक प्रसिध्दीद्वारे महात्मा ज्योतिबा फुले जल व **भूमी संधारण अभियान** अधिकाधिक लोकाभिमुख करण्यात यावे. अभियानात राबवावयाचे उपक्रम / कार्यक्रम याचा

कालबध्द विस्तृत तपशिल तसेच सूचना आयुक्त (कृषि) यांनी स्वतंत्रपणे निर्गमित कराव्यात. तसेच त्यांनी या कार्यक्रमाची स्थानिक पातळीवर जास्तीतजास्त प्रचार होण्याकरिता पोस्टर, घडी पत्रिकांची छपाई, स्थानिक वृत्तपत्रातून जाहिराती प्रसिद्ध करणे, ग्राम पंचायत/ पंचायत समिती व जिल्हा परिषदेमार्फत स्थानिक लोकप्रतिनिधीचा सहभाग घेवून विविध कार्यक्रमांचे आयोजन करावे, बस स्थानकावर जिंगल्सद्वारे तसेच गावांमध्ये कलापथकाद्वारे पथनाट्य, वगनाट्य व पोवाड्यासारख्या कार्यक्रमाचे आयोजन करून अभियानाची प्रसिध्दी करावी.

**१०. अहवाल सादरीकरण :**

विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी यांनी गठीत केलेल्या वरील समित्यांच्या वेळोवेळी बैठका घ्याव्यात. या अभियान कालावधीत प्रत्येक जिल्हाधिका-याने एक सर्वंकष अहवाल माहे जुलै, २०११ पर्यंत शासनास पाठवावयाचा आहे. या अहवाला सोबतच्या दस्तऐवजांमध्ये केलेल्या कामाच्या पुष्ठ्यर्थ (support) पूर्वीचे व सध्याचे छाया चित्र (photo), चित्रफित (video) व वर्तमानपत्रातील कात्रणे इत्यादी पाठवावेत. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी देखील सर्व क्षेत्रीय यंत्रणेमार्फत या अभियानास व्यापक प्रसिध्दी द्यावी व झालेल्या कार्यवाहीचा अहवाल वरीलप्रमाणे शासनास सादर करावा.

११. महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियानांतर्गत द्यावयाच्या बक्षिस योजनेसंबधीचा शासन निर्णय स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३३०१५१६४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुनील चव्हाण)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
प्रमुख मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती,
मुख्य सचिव यांचे सहसचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,

... ५

महासंचालक, कै.वसंतराव नाईक स्वावलंबन मिशन,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय ( सर्व)
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे,/सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे, (स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता ),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व मुख्य वनसंरक्षक,/ सर्व उपवनसंरक्षक,
वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
उपसंचालक, सामाजिक वनीकरण,
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १ व २, मुंबई व नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
जल-८ (निवड नस्ती), ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय, मुंबई.